**सन २०२४-२५ मध्ये RKVY कॅफ्टेरिया अंतर्गत कोरडवाहु क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमाची अंमलबजावणीसाठी सर्वसाधारण प्रवर्गाचा पहिल्या हप्त्याचा निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- राशेअ-२०२४/प्र.क्र.१५३/८-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०००३२.
दिनांक : १ जुलै, २०२४.

**संदर्भ:-**

१. केंद्र शासनाने www.agricoops.nic.in या संकेत स्थळावरील राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सुचना.
२. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र. ३४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०२४
३. कृषि विभाग शासन पत्र क्रमांक CSS २०२४/C.R.१२/२-A दिनांक १३.०५.२०२४
४. कृषि विभाग शासन निर्णय क्रमांक राशेअ-४४२४/प्र.क्र.१२७/८-अे, दि. २८.०५.२०२४.
५. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. १-१५/२०२४ आरकेव्हीवाय/१, दि. ०३.०६.२०२४
६. कृषि संचालक (वि. व प्र.) यांचे पत्र क्र.वि.प्र.३/कोक्षेवि/अनु/प्र.क्र.७/र-५१/२४, दिनांक १८.६.२०२४

**प्रस्तावना :-**

सन २०२२-२३ पासून कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) हा कार्यक्रम राष्ट्रीय कृषि विकास योजना RKVY कॅफ्टेरिया अंतर्गत घेण्यात येत आहे. त्याकरिता केंद्र व राज्य हिश्श्याचे अनुदानाचे प्रमाण ६०:४० असे आहे.

राष्ट्रीय कृषि विकास योजना RKVY कॅफ्टेरिया अंतर्गत समाविष्ट केल्यामुळे RKVY च्या मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील SLSC च्या दिनांक ३.५.२०२४ रोजीच्या बैठकीत केंद्र हिस्सा रु.२२००.०० लाख व त्यासाठीचा पूरक राज्य हिस्सा रु.१४६६.६७ लाख याप्रमाणे एकूण रु.३६६६.६७ लाख निधीच्या वार्षिक कृती आराखडयास मान्यता दिली आहे. त्यानुसार राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान (NMSA) अंतर्गत कोरडवाहु क्षेत्र विकास (RAD) अंतर्गत सन २०२४-२५ साठी रु. ३६६६.६७ लाख इतक्या निधीच्या वार्षिक कृति आराखड्यास दिनांक २८ मे, २०२४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

केंद्र शासनाने संदर्भ क्र. ५ अन्वये राष्ट्रीय कृषि विकास योजना (RKVY) अंतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमासाठी सन २०२४-२५ करिता सर्वसाधारण प्रवर्गासाठी पहिल्या हप्त्याचा केंद्र हिस्सा रु. ४३४.०० लाख निधी वितरित केला आहे. त्यास अनुरुप राज्य हिस्सा रु.२८९.३३३३४ लाख असा एकूण ७२३.३३३३४ लाख निधी आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

१. सन २०२४-२५ मध्ये RKVY कॅफ्टेरिया अंतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमाच्या अंमलबजावणीकरिता सर्वसाधारण प्रवर्गासाठी प्राप्त झालेला पहिला हप्ता केंद्र हिस्सा रु.४३४.०० (रुपये चार कोटी चौत्तीस लाख फक्त्) त्यास अनुरुप राज्य हिस्सा रु.२८९.३३३३४ लाख (रुपये दोन कोटी एकोणनव्वद लाख तेहत्तीस हजार तीनशे चौत्तीस फक्त्) असा एकूण रु.७२३.३३३३४ लाख (रुपये सात कोटी तेवीस लाख तेहत्तीस हजार तीनशे चौतीस फक्त) इतका निधी आयुक्त (कृषि) यांना निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे पुढीलप्रमाणे वितरीत करण्यात येत आहे.

२. सदरचा निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| | **केंद्र हिस्सा** | **राज्य हिस्सा** |
|---|---|---|
| **सर्वसाधारण प्रवर्ग** | **मागणी क्र.डी-३,**<br>२४०१-पीक संवर्धन,<br>१०९-विस्तार व प्रशिक्षण,<br>०१-माहिती व प्रसारण, (०१)(५१)-कृषी उन्नती योजना - राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान - जिरायती क्षेत्र विकास कार्यक्रम (केंपुयो)<br>(केंद्र हिस्सा ६०%)<br>(२४०१ ९५५४) ३३, अर्थसहाय्य. | **मागणी क्र.डी-३,**<br>२४०१-पीक संवर्धन,<br>१०९-विस्तार व प्रशिक्षण,<br>०१-माहिती व प्रसारण, (०१)(५३)-कृषी उन्नती योजना - राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान - जिरायती क्षेत्र विकास कार्यक्रम (केंपुयो)<br>(राज्य हिस्सा ४०%),<br>(२४०१ ए २७२) ३३- अर्थसहाय्य. |

३. या शासन निर्णयान्वये वितरीत निधी कोषागारातून आहरित करण्याकरिता आयुक्त (कृषि) यांना नियंत्रक अधिकारी व सहायक संचालक (लेखा), कृषी आयुक्तालय यांना आहरण व संतिरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. केंद्रिय कृषि मंत्रालयाने राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास कार्यक्रमासाठी राज्य शासनास सन २०२४-२५ करीता मंजूर केलेल्या कृति आराखड्यानुसार आणि तसेच केंद्र शासनाच्या दिनांक २० मे, २०२४ रोजीच्या पत्रान्वये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनानुसार सदर योजनेची अंमलबजावणी करण्यात यावी. याबाबत संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी राज्यस्तरावरून अभियानाचे संनियंत्रण करावे, त्याचप्रमाणे अभियानाच्या प्रभावी अंमलबजावणी व संनियंत्रणाकरीता वेळोवेळी अधिनस्त कार्यालयांना निदेशित करावे.

५. या योजनेंतर्गत लाभार्थ्यांची निवड व अनुदान मंजूरीची कार्यवाही महा-डीबीटी प्रणालीद्वारे करावी आणि लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बॅक खात्यावर अनुदानाची रक्कम सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीद्वारे जमा करावी.

६. प्रत्येक महिन्याला योजनेची भौतिक आणि आर्थिक प्रगती याबाबतची माहिती अद्ययावत करण्यात यावी व राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांसोबतच्या परिशिष्ट-३ मध्ये भरण्यात यावी व सदरची माहिती राज्य शासनाकडेसुद्धा पाठविण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाकित दि. १ एप्रिल, २०२४ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन व सदर परिपत्रकातील अटी शर्तींची पूर्तता करुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७०११५२२५०३००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHENDRA SOPAN GHADGE

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=9847eac29efa7aa62661b16d1619a1bfaf6d99b23ec6836d8d498d0797965898, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=761BD1B7183B95814545ACE2DBF80778C68C7EE4EF46BAA6EA9B8BD1F47C2642, cn=MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2024.07.01 18:02:23 +05'30'

**( महेंद्र घाडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (कृषि), महाराष्ट्र राज्य, मुंबई ४०० ०३२.
२. विधान सभा/विधान परिषद सदस्य,
३. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६. आयुक्त (कृषि),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
७. संचालक (सर्व), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
८. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व),
९. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) महाराष्ट्र, मुंबई/नागपुर
११. महालेखापाल (लेखा परीक्षण) महाराष्ट्र, मुंबई/नागपुर
१२. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१३. संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
१४. सह सचिव/उप सचिव/ अवर सचिव/कार्यासन अधिकारी (सर्व) (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
१५. वित्त विभाग (का. व्यय-१/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय,मुंबई
१६. निवडनस्ती ८-अे